**शालेय पोषण आहार योजनेचे खाते ICICI या खाजगी बँकेमध्ये उघडण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०१८/प्र.क्र.१२१/एस.डी.३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १५ नोव्हेंबर, २०२१

**संदर्भ** :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा.प्रशा.५, दि.०३/०३/२०२१.

२) केंद्र शासनाच्या वित्त व व्यय मंत्रालय, पी.एफ.एम.एस. विभाग, यांचे आदेश क्र.एफ.नो.१(१३)पी.एफ.एम.एस./एफ.सी.डी./२०२०, दि. २३/०३/२०२१.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा.प्रशा.५, दि. २०/०५/२०२१.

४) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय क्र.समग्र-२०२१/प्र.क्र.११२/एस. डी.-१, दि.१७/०६/२०२१.

५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि.०१/०७/२०२१.

६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८४/कोषा प्रशा-५, दि. १५/०९/२०२१.

**पार्श्वभूमी** :-

प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण करणे, प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या पट नोंदणी व उपस्थितीचे प्रमाण वाढविणे आणि शाळेतील विद्यार्थ्यांची गळती थांबविण्याकरिता केंद्र पुरस्कृत शालेय पोषण आहार योजना सुरू करण्यात आली आहे. राज्य व केंद्र शासनाच्या, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या, खाजगी अनुदानित व अंशत: अनुदानित शाळा या ठिकाणी इयत्ता १ ली ते ८ वी पर्यंतचे विद्यार्थी शालेय पोषण आहार योजनेचे लाभार्थी आहेत. सदर योजनेचे उदिष्ट पूर्ण करण्यासाठी केंद्र शासनाव्दारा अंमलबजावणी आराखडा देण्यात आलेला आहे. सदर योजनेत निधी वितरणाकरिता केंद्र शासनाचा निधी ६० टक्के व

राज्य शासनाचा निधी ४० टक्के इतका आहे. सदर योजनेअंतर्गत उपलब्ध होणारे अनुदान राज्य स्तरावरील शिक्षण संचालक (प्राथ.), जिल्हा, तालुका तसेच शाळा स्तरापर्यंत वितरीत होत असते.

केंद्र शासनाचे दि.३१ मे, २०२१ च्या आदेशान्वये तसेच, वित्त विभागाच्या दि.०१ जुलै, २०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीचे व्यवस्थापन सिंगल नोडल एजन्सी (SNA) मार्फत PFMS प्रणालीचा वापर करुन करण्याचे निर्देश आहेत. वित्त विभागाने दि.१५ सप्टेंबर, २०२१ च्या शासन निर्णयान्वये केंद्र शासनाच्या आदेशानुसार सिंगल नोडल एजन्सीकरिता स्टेट बँक ऑफ इंडिया किंवा इतर कोणतीही राष्ट्रीयकृत बँक तसेच रिझर्व बँकेने दि.१९ जानेवारी, २०२१ च्या परिपत्राकाव्दारे Domestic Systematically Important Banks म्हणून घोषित केलेली ICICI बँकेमध्ये खाते उघडण्यास मान्यता दिलेली आहे. सबब, शालेय पोषण आहार योजनेकरिता ICICI बँकेस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

केंद्र पुरस्कृत शालेय पोषण आहार योजनेचे खाते ICICI या खाजगी बँकेत उघडण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे. याबाबत शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे हे शालेय पोषण आहार योजनेकरिता सिंगल नोडल एजन्सी म्हणून काम पाहतील.

i. कोणतेही अतिरिक्त शुल्क खाजगी बँकेमार्फत आकारण्यात येणार नाही.

ii. T + १ पेक्षा जास्त कालावधीसाठी बँकेमध्ये निधी पडून राहणार नाही.

iii. बँकेने महिनाभरात झालेल्या व्यवहारांची माहिती दरमहा शालेय शिक्षण व क्रिडा विभाग तसेच वित्त विभागास सादर करावी.

iv. शालेय पोषण आहार योजनेसंबंधित शिक्षण संचालक (प्राथ.), प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधित बँकेशी करारनामा करावा.

v. शालेय पोषण आहार या योजनेचे खाते ज्या बँकेमध्ये आहे त्या बँक खात्याचे विभागाच्या चार्टट अकाऊंट मार्फत ऑडीट करुन शिल्लक रक्कम त्वरीत नवीन बँक खात्यात जमा करावी.

vi. प्रस्तुत योजनेच्या संदर्भात शासनाने वेळोवळी दिलेल्या निर्देशाचे पालन करणे संबंधित बँकेस बंधनकारक राहील.

२. शिक्षण संचालक (प्राथ.), यांनी तात्काळ सिंगल नोडल एजन्सी (SNA) बँक खाते उघडून ते PFMS ला जोडण्याची कार्यवाही करावी. तसेच, याबाबत राज्य शासन व केंद्र शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८४/कोषा प्रशा-५, दि.१५ सष्टेंबर, २०२१ अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११५१५३०००३१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA
SHANKARRAO
PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2021.11.15 16:03:00 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

४) मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक

५) मा. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

६) मा. राज्य प्रकल्प संचालक, प्राथमिक शिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई

७) मा. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक

९) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे

१०) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे

११) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)

१२) वित्त विभाग, कोषा प्रशा-५, मंत्रालय, मुंबई.

१३) श्री. विकास देशमुख, प्रादेशिक प्रमुख, ICICI बँक, पुणे.

१४) शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

१५) निवड नस्ती - एस.डी. ३.